**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, पांढुर्णा ता. आष्टी, जि. वर्धा, येथील विहिर खोलीकरण व पाण्याच्या टाकीच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. शाआदु-२००९/प्र.क्र.३३०/का.१३**
**मंत्रालय विस्तार, मुंबई**
**दि :-३० डिसेंबर २००९**

**शासन निर्णय** : कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आर्वी, यांनी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, पांढुर्णा ता. आष्टी, जि. वर्धा येथील विहिर खोलीकरणाच्या व पाण्याच्या टाकीच्या बांधकामाचे रू. ४,६१,०००/- (रु.चार लाख एकसष्ट हजार फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक व आराखडा प्रशासकीय मान्यतेसाठी पाठविले आहे.

२. सदर अंदाजपत्रक उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग,आष्टी यांनी तयार केले असुन कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आर्वी, यांनी तपासली आहे व साक्षांकितही केले आहे.

३. सदर अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. तरी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या एकुण रु.४,६१,०००/- (रु.चार लाख एकसष्ट हजार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर बांधकामाचा खर्च सन २००९-१० साठी मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विपअ-१००१/प्र.क्र. ४६/२००१ विनियम, दि. ११ जुलै २००१ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

G.R.330

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०१००१०२१४१०५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(गी. मो. चांदे )
अवर सचिव

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आर्वी
उप विभागीय अभियंता, सा.बां. उपविभाग, आष्टी
कक्ष अधिकारी (का.७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती का-१३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.